राज्य रक्त संक्रमण परिषद, मुंबई
निधी वितरीत करण्यास मंजुरी देणेबाबत.
(सन २०१५-१६)

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन शुध्दीपत्र क्र. रारसे-२०१५/प्र.क्र.२४६/आ-५,

जी.टी.रुग्णालय आवार, कॉम्प्लेक्स बिल्डींग,
८ व १० मजला, नवीन मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ३१ ऑक्टोबर, २०१५

**वाचा :**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१५/प्र.क्र.२९/अर्थ-३, दि. १७ एप्रिल, २०१५.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५.
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन ज्ञापन क्रमांकःअर्थसं-२०१५/प्र.क्र.११८/अर्थसंकल्प, दि. ५ जून, २०१५.
४) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे क्र.संआसे/सहाय्यक अनुदाने-रा.र.सं.प./प्र.क्र.५१५/२०१५, दि. २२ जून, २०१५ चे पत्र.
५) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः रारसे-२०१५/प्र.क्र.२४६/आ-५, दि. ७ ऑक्टोबर, २०१५.

**प्रस्तावना :**

वरील वाचा क्र. ५ येथे नमुद शासन निर्णयान्वये राज्य रक्त संक्रमण परिषद, मुंबई या संस्थेस (२२१० ४४७३-योजनांतर्गत) या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ साठी अर्थसंकल्पीत केलेल्या रु.४२.०० कोटी इतक्या आर्थिक तरतूदीतून माहे एप्रिल व मे, २०१५ या दोन महिन्यांतील खर्च भागविण्याकरिता रु.४.२० कोटी इतका निधी वितरीत करण्यास मंजुरी देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयास अनुसरुन राज्य रक्त संक्रमण परिषदेस रु.४.२० कोटी निधी अदा करण्याबाबतचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर केले असता, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांनी सदर देयकावर देयकावर घेतलेला आक्षेप क्र. ३३ खालील प्रमाणे :

१) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-०३, दि.१७/०४/२०१५ सोबतचे परि.मधील मुद्दा क्र.०९ समोर नमूद तपासणी सूचीनुसार GR मधील सर्व अटींची तसेच उक्त शासन निर्णयातील परि. ०७ ते १८ मधील अटीची पूर्तता होत असल्यास प्रशासकीय विभागाने त्याच्या स्तरावर निधी वितरीत करावा व निधी वितरीत करणाऱ्या आदेशामध्ये वरील प्रत्येक अटीची पूर्तता झाली असे प्रमाणपत्र देऊन आदेश निर्गमित करावेत. अन्यथा प्रस्ताव आवश्यक त्याठिकाणी नियोजन /वित्त विभागाला सहमतीसाठी सादर करावा.

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३४/कोषा प्रशा ५/ दि.२४.०७.२०१५ मधील परिच्छेद 'अ' **व** 'ब' मधील अनु.क्र.२ व ३ नुसार नमूद बाबींचा उल्लेख शासन आदेशात करुन, आदेश निर्गमित करावे."

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांनी घेतलेल्या वरील आक्षेपाची पुर्तता करण्याच्या दृष्टीने राज्य रक्त संक्रमण परिषद, मुंबई या संस्थेस निधी वितरीत करण्यास मंजुरी दिलेल्या वरील वाचा येथील क्र.५ येथे नमुद केलेल्या दि.७ ऑक्टोबर, २०१५ रोजीच्या शासन निर्णयावर खालीलप्रमाणे दुरुस्ती करण्यात येत आहे.

**शासन शुध्दीपत्र :**

राज्य रक्त संक्रमण परिषद, मुंबई या संस्थेस रु.४.२० कोटी इतका निधी वितरीत करण्यास मंजुरी दिलेल्या वाचा क्र. ५ येथे नमुद दि.७ ऑक्टोबर, २०१५ रोजीच्या शासन निर्णयातील अनु.क्र.५ येथे नमुद केलेला खालील परिच्छेद वगळवा :

सदर आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार व वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-एक, अ.क्र.२७, नियम क्र.१४९ मध्ये केलेल्या सुधारणेनुसार प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकाराखाली निर्गमित करण्यात येत आहे

**त्याऐवजी खाली नमुद केलेला परिच्छेद वाचावा तसेच त्यानंतर पुढील पृष्ठावर नमुद परिशिष्ट समाविष्ट करण्यात येत आहे :**

राज्य रक्त संक्रमण परिषदेचा निधी वितरणाचा प्रस्ताव, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०१५ निधी वितरणाबाबत वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/०४/२०१५ सोबतच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.०९ समोर नमुद तपासणीसूचीनुसार तपासला असून, सदर शासन परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील सर्व अटींची पुर्तता होत आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे. तसेच वित्त विभागाने उक्त शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्प अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी परिपत्रकासोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या बाबींची पुर्ती होत असल्यास विभागाने त्यांच्या स्तरावर निधी वितरीत करण्यास मंजुरी दिली आहे. त्यास अनुसरुन शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-एक, अ.क्र.२७, नियम क्र.१४९ मध्ये केलेल्या सुधारणेनुसार प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार राज्य रक्त संक्रमण परिषद, मुंबई या संस्थेस रु.४.२० कोटी इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

**वित्त विभागाने "कोषागारात देयके पारित करताना घ्यावयाची दक्षता" याबाबत निर्गमित केलेले क्र.संकीर्ण २०१५/प्र.क्र.३४/कोषा.प्रशा.५, दि. २४ जुलै, २०१५ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार प्रशासकीय विभागांनी निधी वितरित करताना आदेशामध्ये समाविष्ठ करावयाचे परिशिष्ट-अ**

**परिशिष्ट-अ**

| | | |
|---|---|---|
| १ | विभागास प्रदान वित्तिय अधिकार | शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ /विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-एक, अ.क्र.२७, नियम क्र.१४९ मध्ये केलेल्या सुधारणेनुसार प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार शुध्दीपत्र निर्गमित. |
| २ | मंजूर निधी | सन २०१५-१६ साठी (२२१० ४४७३) या लेखाशिर्षाखाली रु.४२.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. त्यापैकी रु.४.२० कोटी करण्यात येत आहे. |
| ३ | मागील ३ महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे. | चालू वित्तीय वर्षात अद्यापी कोणताच निधी वितरीत केलेला नाही. |
| ४ | ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरित करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. | नाही |
| ५ | स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे. | राज्य रक्त संक्रमण परिषदेमार्फत स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान दिले जात नाही. |
| ६ | वैयक्तिक लाभार्थींचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे. | असल्यास, सुचनेनुसार कार्यवाही करण्यात येईल. |
| ७ | बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिकाऱ्यांची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा. | बांधकाम विषयक देयके असल्यास प्रशासकीय मान्यतेचा शा.नि. सादर केला जाईल. |
| ८ | अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी रितसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत. | खरेदी नियोजन करण्यात येते व आवश्यकतेनुसारच दर करारावर खरेदी करण्यात येते. |
| ९ | खरेदी विषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा. | --,,-- |
| १० | साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी. | सुचनेनुसार कार्यवाही केली जाईल. |

सदर शासन शुध्दीपत्र वित्त विभाग,शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-एक, अ.क्र.२७, नियम क्र.१४९ मध्ये केलेल्या सुधारणेनुसार प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन शुध्दीपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५१०३११२०७२४२२१७ असा आहे. हा शुध्दीपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayshree Suresh Jadhav

Digitally signed by Jayshree Suresh Jadhav
DN: CN = Jayshree Suresh Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.10.31 14:34:46 +05'30'

**( ज. सु. जाधव )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) आणि (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व कोषागारे, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. मा.मंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई.
९. संचालक, राज्य रक्त संक्रमण परिषद, मुंबई.
१०.सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
११.प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
१२.प्रधान सचिव (आरोग्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३.नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय, मुंबई.
१४.वित्त विभाग, (व्यय-१३), (अर्थसंकल्प-९)मंत्रालय, मुंबई.
१५.सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा), (लेखा शाखा), मंत्रालय, मुंबई.
१६.निवडनस्ती (आरोग्य-५)